मौजे सुटाळा बु, ता.खामगांव, जि.बुलडाणा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या सुधारीत अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग

**शासन निर्णय क्रमांकः क्र. सुप्रभा २११३/प्र.क्र.१४६/पापु १३**

**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक**

**मुंबई-४०० ०३२**

**तारीखः २५ फेब्रुवारी,२०१५**

**वाचा -**

१) ग्रामपंचायत सुटाळा बु.ग्रामसभा ठराव दि.२३/०२/२०११

२) अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती यांचे पत्र क्र. भानिक/अम/तांशा/तां.मं./५२/२०१३,दि.०२/०३/२०१३

३) मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बुलडाणा यांचे पत्र क्र.बुजिप/ग्रापापुवि/तांशा/८७/२०१२,दि.०३/०४/२०१३

**प्रस्तावना -**

मौजे सुटाळा बु.ता.खामगांव,जि.बुलडाणा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.१८०.५३ लक्ष (ढोबळ)** किमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भीय क्र.१ येथील ग्रामसभा ठरावाद्वारा प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तथापी योजनेच्या खर्चात काही अपरिहार्य कारणामुळे वाढ झाली. त्यामुळे अधिक्षक अभियंता, विभागीय भारत निर्माण कक्ष, अमरावती यांनी प्रस्तुत योजनेस संदर्भाधिन पत्र क्र.२ अन्वये सुधारीत तांत्रिक मान्यता दिली. यास्तव प्रस्तुत योजनेचा **रु.२४९.८९ लक्ष (ढोबळ)** किंमतीच्या नळ पाणी पुरवठा योजनेच्या आराखडयास व अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद बुलडाणा यांनी संदर्भाधिन पत्र क्र. ३ अन्वये शासनास सादर केला होता. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

मौजे सुटाळा बु. ता.खामगांव, जि.बुलडाणा या नळ पाणी पुरवठा योजनेच्या **रु.२४५.३९ लक्ष (ढोबळ) (दोनशे पंचेचाळीस लक्ष एकोणचाळीस हजार फक्त) एवढ्या**

**सुधारित किंमतीच्या अंदाजपत्रकास** पुढील अटींच्या अधिन राहून सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**अटी**

१. उपरोक्त नमुद सुधारित किंमतीत उर्वरित कामे १२ महिन्यात पूर्ण करावीत.

२. या योजनेच्या सुधारीत तांत्रिक मान्यतेच्या आदेशात नमुद केलेल्या अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. ही योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधित ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधित कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद बुलडाणा यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यास संबंधीत ग्रामपंचायत/जिल्हा परिषद जबाबदार राहील. योजना प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हा परिषद व संबंधित ग्रामपंचायतचे अधिकारी यांनी योजनेची संयुक्तपणे पाहणी आयोजित करावी आणि अशा पाहणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. ही योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) या साठी दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी ,योजनेतील घसारा किंवा यंत्रसामुग्री नुतनीकरणासाठी संबंधित ग्रामपंचायतीस/जिल्हा परिषदेस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही.

५. सदर योजना पुर्ण झाल्यावर स्थानिक स्वराज्य संस्थेने ( संबधित ग्रामपंचायत/ जिल्हा परिषद) योजना हंस्तातरित करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच योजनेचे लेखे बंद करण्यात यावेत.

६. सदर योजना आर्थिकदृष्ट्या सक्षम राहण्याच्या दृष्टीने पाणीपट्टी आकारण्याची जबाबदारी संबधित ग्रामपंचायत/जिल्हा परिषद यांची राहील.

७. प्रस्तुत योजना कोणत्याही परिस्थितीत पुर्नसुधारित करण्यात येऊ नये.

८. हगणदारीबाबतच्या प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

२. या योजनेवर सुधारित किंमतीतील वाढीव खर्च **रु.६४.८६ लक्ष (रु.चौसष्ट लक्ष शाऐंशी हजार फक्त)** हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमा खालील राज्य हिश्श्यातून /जिल्हा नियोजन

मंडळाकडून /किमान गरजा कार्यक्रमांतर्गत जिल्हा परिषद बुलडाणा यांना उपलब्ध होणा-या निधीतून करण्यात यावा.

**३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१२५/११४३, दिनांक३१/०५/२०१४ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ ४३/व्यय-३,दि.०७/०२/२०१५ अन्वये मिळालेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.**

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०२२५१०३८२११८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMBEKAR SURESH D

Digitally signed by AMBEKAR SURESH D
DN: CN = AMBEKAR SURESH D, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2015.02.25 12:13:44 +05'30'

**( सु.दे.आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
३) जिल्हाधिकारी, बुलडाणा.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, बुलडाणा
५) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, अमरावती
६) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती
७) वरिष्ट भुवैज्ञानिक भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, बुलडाणा.
११) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
१२) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई.
१३) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण ना.व ग्रा.योजना विभाग,बुलडाणा
१४) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, बुलडाणा
१५) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१७) सर्व कार्यासने, पा. पु. व स्व. वि.मंत्रालय,मुंबई-३२.
२०) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.